**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यांवर यापुढे भविष्यात कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारण्यास मनाई करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- आरओडी- १०९९/२६५८७/(३०९/९९)/रस्ते-४**
**मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.**
**दिनांक:- ४ फेब्रुवारी, २०००.**

**शासन निर्णय**

राज्यातील विविध रस्त्यांवर ठिकठिकाणी शहरांत व शहरांलगत, रस्त्यांच्या बाजुस अथवा चौकामध्ये पुतळे उभारण्यास परवानगी देण्याबाबतच्या अनेक मागण्या विभागास प्राप्त होतात. सदर मागण्यांचा सांगोपांग विचार करता पुढिल गोष्टी निदर्शनास आल्या आहेत.

१.सद्य:स्थितीत रस्त्यावरील वाहतुकीस नियोजित पुतळ्यांमुळे जरी अडचण निर्माण होत नसली तरी भविष्यात वाहतुकीची प्रचंड प्रमाणात वाढ होऊन वाहनांच्या रहदारीस अडचण संभवते.

२.क्वचित प्रसंगी अपघात होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

३.काही वेळा पुतळा कोणाचा उभारावा याबाबत तीव्र मतभेद होतात. अशा वेळी परस्पर विरोधी मागण्या, निवेदने व प्रसंगी आंदोलनेही उभारली जातात.

४.यदाकदाचित समाजकंटकाद्वारे पुतळ्याची विटंबना झाल्यास कायदा व सुव्यवस्थेला बाधा निर्माण होते.

५.भविष्यात वाहतुकीचा ताण कमी करण्याच्या दृष्टीने रस्त्यांचे रुंदीकरण करावयाचे झाल्यास, अथवा उड्डाणपूल/ भुयारी मार्ग बांधावयाचे झाल्यास त्याठिकाणी असलेले पुतळे स्थलांतरित करणे आवश्यक ठरते. अशावेळी काही गटाच्या भावना दुखावल्या जाण्याचा संभव असतो व त्यामुळे काही वेळा आंदोलनेही केली जातात.

वरील सर्व बाबींचा सांगोपांग विचार करुन शासन असे आदेश देत आहे की, राज्य शासनाने यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यांवर पथकिनारावर्ती क्षेत्रात कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारण्यास मनाई करण्याचे धोरण स्वीकारलेले आहे.

यापुढे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यांवर कोणत्याही प्रकारचा पुतळा उभारल्यास संबंधितांवर कायदेशीर कार्यवाही करण्यात यावी.

हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने (अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०४६६/का-२ दि.६/१०/१९९९ अन्वये) निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

४-२-२०००

(दा.व. साठे)
शासनाचे उप सचिव.

रोटा/एक-1055(1,000-2-2000) ) कृ.मा.प.)

प्रत,

मा. राज्यपालांचे सचिव,

मा. मुख्यमंत्र्यांचे अप्पर मुख्य सचिव,

मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्रालयीन विभाग,

सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व मुख्य अभियंते/ सर्व अधीक्षक अभियंते/

सर्व कार्यकारी अभियंते

सर्व आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व जिल्हा परिषदांचे, मुख्य कार्यकारी अधिकारी,

सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालयातील सर्व अधिकारी व कार्यासने,

सा.बां.वि./रस्ते-४-निवड नस्ती,

सा.बां. वि. /लेखापरिक्षा सार संग्रहासाठी.

---

एच-1055(1,000-2-2000)